# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी अतिरिक्त असताना नव्या नियुक्तांना ना-हरकत प्रमाणपत्र व मान्यता दिल्याबाबत

**(१) १०९७ (२३-१२-२०१४). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनेक जिल्ह्यात शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचारी अतिरिक्त असताना जिल्हा शिक्षणाधिकाऱ्यांनी नव्या नियुक्तांना ना-हरकत प्रमाणपत्र व मान्यता दिल्या, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे शासनाला लाखो रुपयांचे आर्थिक नुकसान झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या शासनाची नुकसानाची भरपाई संबंधित जिल्हा शिक्षणाधिकाऱ्यांकडून केली जाईल असा आदेश शिक्षण संचालक (प्राथ.) यांनी दिनांक १ मार्च, २०१४ रोजी वा त्यासुमारास प्रसारित केला परंतु त्या आदेशाची अंमलबजावणी झाली नाही, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, या प्रकरणी जिल्हा शिक्षणाधिकाऱ्यांना निलंबित करुन खातेनिहाय चौकशी का केली नाही,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२०-०२-२०१९) :** (१), (२), (३), (४) व (५) वैयक्तिक मान्यता देताना झालेल्या अनियमिततेच्या प्रकरणांची चौकशी आयुक्त (शिक्षण) यांचेस्तरावर सुरु असून सदर चौकशीअंती दोषी आढळणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाईचा प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

---

## नाशिक जिल्ह्यात एड्सग्रस्त रुग्णांना आवश्यक असलेल्या औषधांचा तुटवडा निर्माण झाल्याबाबत

**(२) १९९३६ (११-०८-२०१६). श्री.प्रकाश गजभिये, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.चंद्रकांत रघुवंशी, डॉ.सुधीर तांबे, श्री.अमरिशभाई पटेल, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर, श्री.रामराव वडकुते, श्री.अनिल भोसले, श्री.अरुणकाका जगताप, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील एचआयव्हीबाधित रुग्णांसाठी आवश्यक एआरटी लिंग एआरटी सेंटरमध्ये औषधांचा तुडवडा निर्माण झाल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक जिल्ह्यात ५१४७ महिला-पुरुष व ३४७ लहान मुलांना एड्सचा संसर्ग झाला असून त्यांच्यासाठी ए.आर.डी. औषधे संजीवनी ठरली आहेत. मात्र या औषधांपैकी (झेडपुल) या गोळयाचा तुटवडा निर्माण झाल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, "झेडएल" ही औषधे रुग्णांना त्वरित उपलब्ध करुन द्यावी अशी मागणी नाशिक बाय पीपल लिव्हिंग विथ एचआयव्ही या संस्थेने जिल्हाधिकारी नाशिक तसेच राज्य शासनाच्या आरोग्य विभागाकडे त्याच दरम्यान केली होती, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, औषधांचा पुरवठा उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२८-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे. केंद्र शासनाकडून झेडएल या औषधाचा पुरवठा झाला नाही.
(३) हे खरे आहे.
(४) महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण सोसायटी स्तरावरुन नॅको, नवी दिल्ली यांच्याकडे पाठपुरावा करुन माहे मे, २०१६ च्या पंधरवड्यानंतर औषध पुरवठा नॅकोकडून प्राप्त झाल्यावर औषधपुरवठा सुरळीत व नियमित करण्यात आला.

---

## राज्यात वैद्यकीय सेवांचे प्रमाणिकरण व गैरव्यवहारांना आळा घालण्यासाठी नवीन कायदा करण्याबाबत

**(३) २०३२८ (२०-०८-२०१६). श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात वैद्यकीय सेवांच्या प्रमाणिकरणासाठी आणि त्याद्वारे या क्षेत्रातील गैरव्यवहारांना आळा घालण्यासाठी नविन कायदा तयार करण्याच्या विचाराधीन असलेल्या बाबींवर निर्णय घेण्यात आला आहे काय,
(२) असल्यास, निर्णयाचे स्वरुप काय आहेत व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२७-०८-२०१८) :** (१) व (२) नाही.
महाराष्ट्र क्लिनिकल एस्टॅब्लिशमेंट विधेयकातील तरतूदींवर संबंधित क्षेत्रातील व्यक्ती वा संस्थांचे स्पष्ट अभिप्राय जाणून घेण्यासाठी उप संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये) मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. या समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर पुढील कार्यवाही केली जाणार आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सरपंचांच्या मानधनात वाढ करण्याबाबत

**(४) २२०४७ (१९-०८-२०१६). आर्कि.अनंत गाडगीळ, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात लोकसंख्येच्या आधारावर सन २००० पासून सरपंचाना मानधन रुपये २०० होते ते वाढवून सन २००९ साली रुपये ४०० करण्यात आले, वाढती महागाई व सरपंचावरच्या जबाबदाऱ्या या तुलनेत ही रक्कम अत्यंत तुटपुंजी असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सरपंचाना वाढीव मानधन व शासकीय ओळखपत्र देण्यात आलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सध्याच्या महागाईचा आलेख पाहता सरपंचांना मानधनात वाढ देण्याबाबत तसेच शासकीय ओळखपत्र देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२), (३) व (४) ग्रामविकास विभागाच्या दिनांक ६ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये सरपंच मानधनात वाढ करण्यात आली आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने वित्त विभागाने दिलेल्या निदेशानुसार वाढीव दराने सरपंच मानधन व सदस्य बैठक भत्ता अदा करण्याकरीता पुरवणी मागणीद्वारे निधी उपलब्ध करून घेणेबाबत कार्यवाही करण्यात आली. आता वरील वाढीव दरानुसार सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये रक्कम उपलब्ध करून देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली आहे.

त्याचप्रमाणे या विभागाच्या दिनांक ११ फेब्रुवारी, २०१४ च्या शासन निर्णयान्वये ग्रामपंचायतींच्या सरपंचांना ओळखपत्र देणेबाबत सर्व जिल्हा परिषदांना निर्देश देण्यात आले आहेत. तसेच यासंदर्भात कालबध्द कार्यक्रम आखून दिनांक ११/०२/२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार

ओळखपत्र वाटप पूर्ण करणेबाबतही सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच नवीन निवडून येणारे सरपंचांना त्यांनी पदभार स्विकारल्यानंतर एक महिन्यामध्ये ओळखपत्र देण्यात येत आहे याची खातरजमा करणेबाबतही सर्व विभागीय आयुक्त, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सूचना देण्यात आल्या आहेत. यानुसार आतापर्यंत १९६२४ सरपंचांना ओळखपत्र वाटप करण्यात आले असून उर्वरीत सरपंचांना ओळखपत्र वाटपाची कार्यवाही सुरू आहे.

---

## मौजे विरसई (ता.दापोली, जि.रत्नागिरी) येथे नवीन पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्याबाबत

**(५) २३२०१ (१२-०८-२०१६). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे विरसई (ता.दापोली, जि.रत्नागिरी) येथे नवीन पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्याबाबत जिल्हा पशुवैद्यकीय अधिकारी, जि.प. रत्नागिरी यांनी तसेच, विरसई जनसेवा मंडळ या स्थानिक सामाजिक संस्थेमार्फत देखील शासनाकडे मागणी करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विरसई हे डोंगराळ भागातील गाव असून शासनाच्या आदर्श ग्राम योजनेत समाविष्ट असल्याने प्रचलित निकष शिथिल करुन तेथे खास बाब म्हणून पशुवैदयकीय दवाखाना स्थापन करण्यात यावा, अशी मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी तत्कालिन मा.पशुसंवर्धन व दुग्धविकास मंत्री यांच्याकडे दिनांक २३ फेब्रुवारी, २०१५ व दिनांक ६ एप्रिल, २०१६ रोजी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त मागणीनुसार प्रचलित नियम व निकष शिथिल करुन मौजे विरसई येथे पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ स्थापन करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे.

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (२१-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) मौजे विरसई (ता.दापोली, जि.रत्नागिरी) येथे नवीन पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जि.प. रत्नागिरी यांचेकडून आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयाकडे प्राप्त झालेला होता. प्राप्त प्रस्तावाचे अवलोकन करता, मौजे विरसई (ता.दापोली, जि.रत्नागिरी) या गावाच्या प्रस्तावित कार्यक्षेत्रातील एकूण पशुधन घटक संख्या केवळ १४९८ एवढी असून, शासन निर्णय, क्रमांक जिवायो-२०१०/प्र.क्र.२९१/पदुम ४, दिनांक ०१/०७/२०११ अन्वये डोंगरी भागात नवीन पशुवैद्यकीय दवाखाना स्थापनेसाठी किमान ३००० पशुधन घटक संख्या असावी असा निकष आहे. तसेच, रत्नागिरी जिल्ह्यातील एकूण पशुधन घटक संख्येचा विचार करता, तेथे सद्य:स्थितीत अस्तित्वात असलेल्या पशुवैद्यकीय दवाखान्यांची संख्या आवश्यक पशुवैद्यकीय दवाखान्यांपेक्षा अधिक आहे.

त्यामुळे, मौजे विरसई (ता.दापोली, जि.रत्नागिरी) येथे नवीन पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करणे निकषात बसत नाही. या गावामध्ये सन २०१२ च्या पशुगणनेनुसार फक्त १२० पशुधन घटक आहेत. सद्य:स्थितीत आदर्श गाव विरसई हे पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२, केळशी या संस्थेच्या कार्यक्षेत्रात असून, सदर संस्थेमार्फत या गावास नियमितपणे पशुवैद्यकीय व पशुआरोग्य सेवा पुरविण्यात येत आहेत. तसेच, पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२, केळशी या दवाखान्याच्या मूलभूत सुविधांमध्ये वाढ करुन विरसई या गावास आठवडी भेट केंद्र (Fix Visit Center) देण्याबाबतची कार्यवाही आयुक्त पशुसवंर्धन कार्यालयाच्या स्तरावर सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई (पूर्व), नालासोपारा (पूर्व) व विरार (पूर्व) (ता.वसई, जि.पालघर) येथील बोगस डॉक्टरांवर कारवाई करण्याबाबत

**(६) २३६९१ (१६-१२-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे, श्री.आनंद ठाकूर, श्री.धनंजय मुंडे, श्री.ख्वाजा बेग, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई (पूर्व), नालासोपारा (पूर्व) व विरार (पूर्व) (ता.वसई, जि.पालघर) येथील वसई-विरार महानगरपालिका क्षेत्रात बोगस डॉक्टरांवर कारवाई करण्यासाठी आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका यांनी वैद्यकीय अधिकारी यांना सक्त आदेश दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वैद्यकीय अधिकारी यांनी महानगरपालिका हद्दीत ५१ बोगस डॉक्टरांची यादी १० महिन्यापूर्वी तयार करुनही त्यांच्यावर कोणतीही कारवाई करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वैद्यकीय अधिकारी यांच्याकडून बोगस डॉक्टरांना संरक्षण देण्यात येत असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन चौकशीच्या अनुषंगाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१६-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

महानगरपालिका स्तरावर स्थापन करण्यात आलेल्या बोगस वैद्यकीय व्यवसायिक संबंधी समिती समोर दिनांक ०४/०२/२०१६ रोजी महानगरपालिकेच्या नागरी प्राथमिक आरोग्य केंद्राच्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना ५१ संशयित बोगस वैद्यकीय व्यवसायिकांची सविस्तर तपासणी करण्याची सूचना देण्यात आली.

(२) हे खरे नाही.

सदर तपासणीमध्ये ५१ संशयित बोगस वैद्यकीय व्यवसायिकांपैकी निश्चितपणे बोगस असल्याचे आढळलेल्या ५ अवैध वैद्यकीय व्यवसायिकांवर

तुळींज पोलीस स्टेशन, नालासोपारा (पूर्व) येथे प्रथम खबरी अहवाल (F.I.R.) दाखल करण्यात आले आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सार्वजनिक आरोग्य विभागाने विवाह मंडळाची नोंदणी करण्याबाबत

**(७) २६७२९ (१५-०४-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सार्वजनिक आरोग्य विभागाने विवाह मंडळाची नोंदणी करण्याबाबत पालिकेच्या आरोग्य विभागाला आदेश दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आतापर्यंत पालिकेच्या आरोग्य विभागाने किती विवाह मंडळांची नोंदणी केली आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन विवाह मंडळानी नोंदणी न केल्यास त्यांच्यावर तसेच आतापर्यंत किती विवाह मंडळांवर कारवाई करण्यात आली वा येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०६-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) एकूण ३४० विवाह मंडळाची नोंदणी केली आहे.
(३) सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका येथील निबंधक, विवाह मंडळ व विवाह नोंदणी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील दोन विवाह मंडळावर दंडात्मक कारवाई केली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## उदगांव व अंकली (जि.सांगली) येथे दोन पोलिसांनी मारामारी केल्याबाबत

**(८) २७५०६ (१४-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उदगांव व अंकली (जि.सांगली) येथे गुन्हे दाखल असलेल्या गुंडाच्या मदतीने मारामारी केलेल्या पोलीस शिपायांसहित गुंडावर मोकांतर्गत कारवाई करण्याचे आदेश कोल्हापुर परिक्षेत्राचे उपमहानिरीक्षक यांनी दिल्याचे दिनांक २० जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपमहानिरीक्षकांच्या आदेशाप्रमाणे कारवाई करण्यात आली आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील गंभीर गुन्हयांतील गुन्हेगाराच्या तपासात त्रुटी राहिल्यास संबंधित तपास अधिकाऱ्यावर कारवाई करण्याबाबत

**(९) २८६१२ (१४-०४-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील गंभीर गुन्हयांतील गुन्हेगारांना शिक्षा होणे गरजेचे असताना प्रत्यक्षात गुन्हयांतील आरोपींच्या विरोधात पुरेसे पुरावे सादर होत नसल्याने आरोपी सुटत असल्याची बाब माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गंभीर गुन्हयांतील गुन्हेगाराच्या तपासात त्रुटी राहिल्यास संबंधित तपास अधिकाऱ्यावर कारवाई करण्याचा निर्णय गृह विभागाने घेतला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासनाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी प्रभावीपणे केली जावी याकरीता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०२-२०१९) :** (१) होय, अंशत: खरे आहे.
(२) व (३) होय.

यासंबंधी शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक डीपीपी-२०१५/प्र.क्र.५१/पोल-१०, दिनांक १७/१०/२०१५ निर्गमित केला आहे. त्यानुसार ज्या गुन्ह्यांमध्ये आरोपींची निर्दोष मुक्तता झाली आहे, त्याबाबतच्या न्यायालयाच्या आदेशाची तपासणी करुन सदर खटल्याचा निकाल शासनाच्याविरुध्द जाण्यामागील कारणे काय आहेत, याची तपासणी करणे व सदर न्यायालयीन प्रकरणाचा निकाल तपासी यंत्रणा अथवा अभियोक्त्यांच्या हलगर्जीपणामुळे शासनाच्याविरुध्द गेला असल्यास, संबंधितांवर जबाबदारी निश्चित करण्यासाठी व त्याबाबतच्या शिफारशी करण्यासाठी जिल्हास्तरावर अतिरिक्त पोलीस अधीक्षक यांच्या अध्यक्षतेखाली तर पोलीस आयुक्तालय स्तरावर पोलीस उपायुक्त (गुन्हे) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे. जर संबंधित तपासी पोलीस यंत्रणा/सरकारी अभियोक्ते हे त्यामध्ये दोषी आढळल्यास त्यासंबंधीचा प्रस्ताव शिस्तभंग विषयक कारवाई करण्यासाठी संबंधित जिल्हा पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त/ संचालक, अभियोग संचालनालय यांच्याकडे पाठविण्याबाबत सूचित करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक रोड येथील मध्यवर्ती कारागृहातील कैद्याने तुरुंग अधिकाऱ्यांवर हल्ला केल्याबाबत

**(१०) २९०१४ (१४-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक रोड येथील मध्यवर्ती कारागृहात मोबाईल सापडल्याची घटना घडल्याने तेथील कैद्यांची अंगझडती घेत असताना तुरुंग अधिकाऱ्यांवर कैद्याने हल्ला केल्याची घटना दिनांक २५ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी नाशिक रोड पोलीस ठाण्यात कैद्यांवर गुन्हा दाखल करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, कारागृहातील कैद्यांकडे मोबाईल सापडणे ही बाब अत्यंत गंभीर असून त्यांच्यापर्यंत मोबाईल कसा पोहचत आहे, याबाबत चौकशी करण्यात आली आहे काय,

(४) असल्यास, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) होय.

दिनांक २४/१२/२०१६ रोजी दु. २.५० वा. मंडल ८ (सेप्रेट) विभाग क्र. १ मधील मोठी लाईन(अ) खोली क्र. ७२ मध्ये असलेला बंदी क्र. सी/९९८६ वेन्सील रॉय मिरींडा ऊर्फ मॉन्टी याचा संशय आल्याने त्याचे खोली जवळ गेले असता त्याने त्याचे जवळ असलेला सॅमसंग कंपनीचा मोबाईल फोडला व संडासच्या भांड्यात टाकला.

सदर घटनेच्या चौकशीसाठी सदर बंद्यास श्री.फड, तुरुंगाधिकारी यांचे समक्ष घेऊन गेल्यानंतर मोबाईलबाबत चौकशी करत असताना सदर बंदी तुरुंगाधिकारी श्री.बाबर यांच्या अंगावर धावून गेला व कॉलर पकडून ओढाताना धक्काबुक्की करण्याचा प्रयत्न केला.

(२) होय.

नाशिक रोड पोलीस ठाणे येथे सदर घटनेबाबत बंदी क्र. सी/९९८६ वेन्सील रॉय मिरींडा (मॉन्टी) याचे विरोधात गुन्हा रजिस्टर क्रमांक ६५२/२०१६ अन्वये दिनांक २५/१२/२०१६ रोजी गुन्हा दाखल केला आहे.

(३) व (४) कारागृहात मोबाईल सापडणे या घटनेस जबाबदार असणारे अधिकारी यांची प्राथमिक चौकशी करून श्री.कैलास भवर, तुरुंग अधिकारी श्रेणी-१, श्री.जी.ए.मानकर, तुरुंग अधिकारी श्रेणी-१ व श्री.एस.एस.कुवर, तुरुंग

अधिकारी श्रेणी-१ यांच्यावर निलंबनाची कार्यवाही करून विषयाधीन प्रकरणी त्यांची विभागीय चौकशी करण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मराठवाड्यातील ग्रामपंचायतीच्या प्रारूप आराखड्याची छाननी पूर्ण करणेबाबत

**(११) २९३७९ (१७-०४-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनाच्या आमचा गाव आमचा विकास या उपक्रमांतर्गत ग्रामपंचायतींना विकास आराखडा तयार करण्याबाबतचे आदेश शासनस्तरावरून देण्यात आले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मराठवाड्यातील ६६४१ ग्रामपंचायतीच्या प्रारूप आराखड्यांची मंजुरी व तांत्रिक समितीकडून छाननी प्रक्रिया पूर्ण करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर ग्रामपंचायतींना निधी देण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (११-०२-२०१९) :** (१) होय.
(२) मराठवाड्यातील ६६४९ ग्रामपंचायतींपैकी ६४७९ ग्रामपंचायतींच्या प्रारुप आराखड्यांची मंजुरी व तांत्रिक समितीकडून छाननी प्रक्रिया पूर्ण करण्यात आली आहे.
(३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत केंद्र शासनाकडून स्थानिक स्वराज्य संस्थांकरीता राज्याला प्राप्त होणारा निधी हा अबांधिल स्वरुपाचा असून केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्राप्त होणारे संपूर्ण अनुदान ग्रामविकास विभागाकडून ग्रामपंचायतींना वितरीत करण्यात येते. शासनस्तरावर चौदाव्या वित्त आयोगाचा कोणताही निधी राखून ठेवता येत नाही. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रस्तुत वितरीत निधीचा विनियोग ग्रामपंचायतींनी

पायाभूत सेवांवर करावयाचा असून त्यातून करावयाच्या खर्चाचे व नियोजनाचे अधिकार संबंधित ग्रामपंचायतीला व ग्रामसभेला आहेत. ग्रामपंचायतींनी प्रस्तुत निधी खर्च करताना ग्रामपंचायत स्तरावर "आमच गाव, आमचा विकास" या कार्यक्रमांतर्गत विकास आराखडा तयार करुन गरजांचा प्राधान्यक्रम निश्चित करुन खर्च करणे आवश्यक आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत कार्यरत असलेल्या अस्थायी (कंत्राटी) कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करण्यासंदर्भात

**(१२) २९४४० (१५-०४-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सार्वजनिक आरोग्य विभागातील महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रण कार्यक्रमांतर्गत कार्यरत असलेल्या अस्थायी (कंत्राटी) कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करण्यासंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(२) असल्यास, यासंदर्भात सद्य:स्थिती काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०६-०१-२०१९) :** (१) व (२) राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम १०० टक्के केंद्र पुरस्कृत कार्यक्रम असून केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्चासाठी केंद्र शासनाकडून अनुदान उपलब्ध होते. यासाठी राज्य शासनाकडून अनुदान दिले जात नाही.

शासनाचे काटकसरीचे धोरण आणि विविध प्रकरणांमध्ये कंत्राटी सेवा नियमित करु नये म्हणून मा.न्यायालयाचे निवाडे पाहता सदर प्रकरणी कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कंत्राटी ग्रामसेवकांची ३ वर्षे सेवाकाळ ग्राह्य धरण्याबाबत

**(१३) ३०५३५ (१७-०४-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे : तारांकित प्रश्न क्रमांक १८९५५ ला दिनांक १ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील कंत्राटी ग्रामसेवकांना ३ वर्षे ग्रामसेवक म्हणून नियुक्त्या देण्यात आल्या असून कृषी सेवक, शिक्षण सेवक याचा हा कालावधी त्यांच्या मिळणाऱ्या सर्व लाभासाठी ग्राह्य धरण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१६-०१-२०१९) :** (१) शिक्षक सेवकांनी व्यतित केलेला ३ वर्षाचा कंत्राटी कालावधी सर्व लाभांसाठी ग्राहय धरण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

कृषी सेवकांनी व्यतित केलेला ३ वर्षाचा कंत्राटी कालावधी अद्याप आश्वासित प्रगती योजनेसाठी ग्राहय धरण्यात आलेला नाही.

(२) व (३) कंत्राटी ग्रामसेवकांनी ३ वर्षाचा व्यतित केलेला कंत्राटी कालावधी हा कालबध्द पदोन्नतीसाठी ग्राहय धरण्यास मान्यता मिळण्याबाबतचा शासन निर्णय, क्रमांक कंत्राटी २०१६/प्र.क्र. १३२/आस्था-७, दिनांक २८ मार्च, २०१८ ला निर्गमित करण्यात आला आहे.

---

## राज्यात परिचर्या महाविद्यालयीन शिक्षकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१४) ३५१९४ (०२-०१-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात नव्याने सुरू केलेल्या बी.एस्सी (नर्सिंग) व एम.एस्सी (नर्सिंग) अभ्यासक्रमासाठी ५ परिचर्या प्रशिक्षण संस्थांमध्ये आवश्यक अध्यापकीय व अशैक्षणिक पद निर्मितीबाबत दिनांक २१ एप्रिल, २०१४ रोजी शासन निर्णय निर्गमित करून ४ वर्षाचा पदवी व २ वर्षाचा पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता दिली असून विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी भारतीय परिचर्या परिषदेच्या मानकानुसार आणि आरोग्य विज्ञान विद्यापीठाची मान्यता/संलग्निकरणाचे नुतनीकरण/विस्तारीकरण प्राप्त होण्यासाठी आवश्यक असणारी अध्यापकीय ४१ पदे व अशैक्षणिक ३ पदे निर्माण करण्यासाठी शासनाने मंजुरी दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त पदे भरण्यासाठी शासनाने दिनांक ९ फेब्रुवारी, २०१७ रोजी शासन निर्णयानुसार समिती गठीत करण्यास मंजुरी दिली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच या रिक्त पदांपैकी काही पदे अनुभवी व सेवाज्येष्ठ प्राध्यापकांमधून भरण्यात यावी या संबंधी ग्रॅज्युएट नर्सेस टिचर्स असो. ऑफ महाराष्ट्र, नागपूर या संघटनेद्वारा तसेच नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी शासनास निवेदने दिली आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१०-०१-२०१९) :** (१), (२) व (३) होय, हे खरे आहे.
(४) परिचर्या प्रशिक्षण संस्थांमध्ये आवश्यक अध्यापकीय पदे भरण्यासाठी मा.कुलगुरू, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ०९/०२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेली समिती शासन शुध्दीपत्रक दिनांक २०/०३/२०१८ अन्वये सुधारित करण्यात आली असून, सदर पदे सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे अध्यक्षतेखाली शासन निर्णय, दिनांक १५/०७/२०१४ नुसार गठित करण्यात आलेल्या स्वतंत्र निवडमंडळामार्फत भरण्यास मान्यता दिली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सर्व शासकीय कर्मचाऱ्यांना संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होणे बंधनकारक केल्याबाबत

**(१५) ३५८९० (०४-०१-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व शासकीय कर्मचाऱ्यांना संगणक अर्हता परीक्षा (एमएससीआयटी) उत्तीर्ण होणे बंधनकारक केले असून त्यांना दिनांक १८ जुलै, २००३ च्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयाप्रमाणे मुदतवाढ दिल्यानंतर प्रशिक्षण पूर्ण न झालेल्या निवृत्त कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीमधून दंड स्वरुपात रक्कम कापली जात आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सेवेत कार्यरत असलेल्या परंतु संगणक प्रशिक्षण पूर्ण न झालेल्या कर्मचाऱ्यांना मुदतवाढ देण्याबाबत कर्मचाऱ्यांकडून मागणी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीतून कपात करण्यात आलेली रक्कम परत मिळावी व सेवेत असलेल्या कर्मचाऱ्यांना मुदतवाढ देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१६-०१-२०१९) :** (१) नाही.

(२) नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औषधनिर्माण अधिकारी संवर्गाचे सेवाप्रवेश नियम अद्ययावत करण्याबाबत

**(१६) ३६१०७ (०२-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे, डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औषधनिर्माण अधिकारी संवर्गाचे सेवाप्रवेश नियम अद्ययावत करण्यासाठी दिनांक १८ एप्रिल, २०17 रोजी मा.राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे अध्यक्षतेखाली बैठक घेण्यात आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बैठकीत झालेल्या निर्णयानुसार औषधनिर्माण अधिकारी संवर्गाचे सेवाप्रवेश नियम अद्ययावत करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१९-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) आरोग्य सेवा संचालनालयाकडून प्राप्त प्रस्तावात तपासणीअंती त्रुटी आढळल्याने त्रुटींच्या पुर्ततेस्तव संचालक कार्यालयाला कळविण्यात आले आहे. सेवा प्रवेश नियम अंतिम करण्याबाबतची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गणेशनगर (जि.औरंगाबाद) येथील पंढरपूर ग्रामपंचायतीच्यावतीने पेव्हर ब्लॉक बसविण्याचे काम पूर्ण करण्याबाबत

**(१७) ३८७५६ (०४-०४-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गणेशनगर (जि.औरंगाबाद) येथील पंढरपूर ग्रामपंचायतीच्यावतीने पेव्हर ब्लॉक बसविण्याचे सुरु असलेले काम अर्धवट पडून असल्याने नागरिकांची जाण्या-येण्यासाठी गैरसोय होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने पेव्हर ब्लॉकचे अर्धवट राहिलेले काम पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९) :** (१) नाही. अशी तक्रार प्राप्त नाही.
(२) गणेशनगर (औरंगाबाद) येथील पंढरपूर ग्रामपंचायतीच्यावतीने पेव्हर ब्लॉक बसविण्याचे काम पूर्ण झाले असून, त्यामुळे नागरिकांची जाण्या-येण्यासाठी कोणतीही गैरसोय झालेली नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेने उपहारगृहांच्या केलेल्या तपासणीबाबत

**(१८) ३९६१० (०६-०४-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.ख्वाजा बेग, अॅड.निरंजन डावखरे, श्री.रामराव वडकुते, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई शहरात दिनांक १० व ११ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास महापालिकेने हॉटेल व उपहारगृहांची तपासणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त तपासणीत काय आढळून आले व तदनुसार संबंधित हॉटेल व उपहारगृहांवर महानगरपालिका अधिनियमांतर्गत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत दिनांक १० व ११ जानेवारी, २०१८ रोजी ७६५ जागांची पाहणी करण्यात आली असून, सदर ठिकाणी महानगरपालिकेमार्फत खालीलप्रमाणे कारवाई करण्यात आली/येत आहे :-

- ५०९ ठिकाणी निरीक्षण अहवाल देण्यात आले.
- ११ ठिकाणे मोहोरबंद करण्यात आली.
- ८३ ठिकाणी वाढीव/अनधिकृत बांधकामे निष्कासित करण्यात आली.

- १९७ अनधिकृत/अतिरिक्त असलेले गॅस सिलेंडर्स जप्त करण्यात आले.
- १६२ ठिकाणी कोणतीही अनियमितता आढळून आली नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासकीय रुग्णालयातील डॉक्टरांच्या वेतनवाढीसाठी व अन्य प्रश्नांसाठी नेमलेल्या समितीबाबत

**(१९) ३९६९० (०४-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.सुधीर तांबे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासकीय, प्राथमिक आरोग्य केंद्रे, ग्रामीण रुग्णालये आणि जिल्हा रुग्णालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या वेतनात वाढ करणे, पदभरती, गैरहजर राहणाऱ्या डॉक्टरांवर कारवाई करणे इत्यादींबाबत उपाययोजना सुचविण्यासाठी माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान मा.सार्वजनिक आरोग्य मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली लोकप्रतिनिधींचा समावेश असलेली समिती नेमण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त समितीने आपला अहवाल सादर केला आहे काय, अहवालाचे स्वरुप काय आहे व त्यावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२७-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) समितीने अद्‌याप अहवाल सादर केलेला नाही.

---

## करमाड (जि.औरंगाबाद) येथील ग्रामपंचायतीने बेरोजगार तरुणांना उद्योग व व्यवसायाकरीता बांधलेल्या गाळयांचा गैरवापर झाल्याबाबत

**(२०) ३९७०६ (०४-०४-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) करमाड (जि.औरंगाबाद) येथील ग्रामपंचायतीने बेरोजगार तरुणांना उद्योग, व्यवसाय करता यावा याकरीता गाळे बांधले होते परंतु गाळयांचा गैरवापर करीत गाळ्यांच्या मूळ रचनेची मोडतोड करुन पोटभाडेकरु ठेवून गैरव्यवहार केल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी गटविकास अधिकाऱ्यांनी संपूर्ण माहिती मागवून अहवाल देण्याचे आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने सदर गाळे हे मूळ मालकांना परत मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे

करमाड, ता.जि.औरंगाबाद ग्रामपंचायतीने बेरोजगार तरुणांना उद्योग व्यवसायाकरीता दुकान गाळे बांधून दिले आहेत. सदरील गाळयामध्ये पोटभाडेकरु ठेवल्याचे निदर्शनास आलेले नाही. गाळे भाडेकरुच्या ताब्यात असून त्यांनी भिंत तोडून मूळ रचनेमध्ये बदल केल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये ग्रामपंचायतीच्या निदर्शनास आले.

(२) होय, हे खरे आहे.

गटविकास अधिकारी, पंचायत समिती, औरंगाबाद यांनी ग्रामपंचायतीला संपूर्ण माहिती घेवून अहवाल देण्याचे आदेश दिले आहेत.

(३) गटविकास अधिकारी, पंचायत समिती, औरंगाबाद यांनी ग्रामपंचायत करमाड, ता.जि.औरंगाबाद येथे भेट दिली असता त्यांना गाळेधारकानी

गाळयाची भिंत तोडून मूळ रचनेमध्ये बदल केल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये ग्रामपंचायतीच्या निदर्शनास आले होते. त्या अनुषंगाने गाळेधारकास गाळे पूर्वस्थितीत ठेवण्याबाबत ग्रामपंचायतीमार्फत संबंधितांना नोटीसा देण्यात आल्या होत्या. त्यानंतर गाळेभाडेकरुंनी स्वत:च्या खर्चाने सदर गाळयाची दुरुस्ती करुन गाळे पूर्वस्थितीत केले व आजरोजी ग्रामपंचायतीच्या अभिलेख्यानुसार संबंधित गाळेधारकाच्या ताब्यात गाळे आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अल्पवयीन मुलींच्या बेपत्ता प्रकरणाबाबत

**(२१) ३९७४१ (०६-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, अॅड.रामहरी रुपनवर, डॉ.सुधीर तांबे, अॅड.हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, श्री.मोहनराव कदम, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सन २०१६ मध्ये सुमारे २८८१ व सन २०१७ मध्ये २९६५ अल्पवयीन मुली बेपत्ता झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार अल्पवयीन बेपत्ता मुलींचा शोध घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, किती अल्पवयीन मुलींचा शोध घेण्यात आला आहे व उर्वरित मुलींचा शोध घेण्यासंदर्भातील सद्य:स्थिती काय आहे,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी किती गुन्हेगारांना अटक करण्यात आली आहे व त्यांचेविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) असल्यास, अशा प्रकारच्या घटनांना आळा बसावा यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०२-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यात सन २०१६ व २०१७ मध्ये अल्पवयीन मुली बेपत्ता झाल्या प्रकरणाची सांख्यिकी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

| सन | अल्पवयीन मुली | |
|---|---|---|
| | अपहरण/ हरवलेल्या | सापडलेल्या |
| २०१६ | ५९७७ | ५६१० |
| २०१७ | ६७०१ | ५९३० |
| एकूण | १२६७८ | ११५४० |

- मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. ७५/२०१२ "बचपन बचाव आंदोलन" संदर्भात दिनांक १० मे, २०१३ रोजी दिलेल्या आदेशानुसार १८ वर्षाखालील हरविलेल्या मुल/मुली संदर्भात अपहरणांचा गुन्हा दाखल करण्यात येतो. त्यामुळे यामध्ये वाढ दिसून येत आहे.
- हरविलेल्या व्यक्तींचा तपास करण्यासंदर्भात प्रमाणित कार्यपध्दती (SOP) तयार करण्यात आली आहे.
- हरविलेल्या मुलांच्या संदर्भात खालील वेबसाईट्स कार्यान्वित आहेत.

१) www.trackthemissingchild.gov.in

२) www.mumbaipolice.gov.in

३) www.shodh.gov.in

- अपहरण/हरवलेल्या मुलींचा शोध घेण्यासाठी पोलिसांकडून सर्वतोपरी प्रयत्न करण्यात येतात. यामुळे बहुतांश अपहरण/हरवलेल्या मुली सापडुन आलेल्या आहेत.

(४) क्राईम इन महाराष्ट्र - २०१६ च्या अहवालानुसार सन २०१६ मध्ये अपनयनाच्या गुन्ह्यांमध्ये एकूण २०४४ आरोपींना अटक करण्यात आली. त्यामध्ये पुरूष १९१७ व महिला १२७ आहेत. सदर प्रकरणात गुन्ह्याचा प्रकार निष्पन्न झाल्यास आरोपीस अटक करून त्यांचेविरूध्द दोषारोपपत्र दाखल करण्यात येते.

(५) अल्पवयीन मुले/मुली बेपत्ता होणे अशा घटनांना प्रतिबंध करण्यासाठी खालील उपाययोजना करण्यात आल्या आहेत :-

- १८ वर्षा खालील हरविलेल्या मुलांच्या बाबतीत थेट अपहरणाचा गुन्हा दाखल करण्यात येतो.
- हरविलेल्या बालकांसंदर्भात आदर्श कार्यप्रणाली SOP सर्व पोलीस घटकांना वितरीत करण्यात आली आहे.
- हरविलेल्या मुले-मुलींची माहिती २४ तासाच्या आत मुख्य नियंत्रण कक्षामार्फत सर्व पोलीस ठाण्यांना बिनतारी संदेशाद्वारे प्रसारीत केली जाते.
- १०९८ ही टोल फ्री हेल्पलाईन कार्यान्वित करण्यात आली आहे.
- अनैतिक मानवी वाहतुकीस प्रतिबंध करण्याकरीता १२ अनैतिक मानवी वाहतूक कक्षाची (AHTU) स्थापना करण्यात आली आहे.
- अनैतिक मानवी वाहतूक प्रतिबंध या विषयावरील One Life NO Price या सीडी द्वारे जागृती करण्यात येते.
- मुंबईच्या धर्तीवर बाल भिक्षेकरी मुक्त करण्याकरीता २४ महानगरपालिका क्षेत्रामध्ये टास्कफोर्स गठीत करण्याचे प्रस्तावित आहे. पोलीस स्टेशनमध्ये ०१ पोलीस अधिकारी हा बाल कल्याण अधिकारी म्हणुन नेमण्यात आला आहे. ४६ पोलीस घटकांचे मुख्यालयात विशेष बाल पोलीस स्थापन करण्यात आलेली आहेत.
- सन जुलै, २०१५ ते जुलै, २०१७ या कालावधीत राबविण्यात आलेल्या ५ आपरेशन मुस्कान अंतर्गत २०११२ हरविलेल्या बालकांचा शोध घेण्यात आला आहे.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आश्रमशाळेतील शिक्षकांचे इतर शाळेत समायोजन करून त्यांचे वेतन सुरू करणेबाबत

**(२२) ४००६८ (०४-०४-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३५६२५ ला दिनांक ११ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात विजाभज, इमाव व विमाप्र विभागामार्फत चालविण्यात येत असलेल्या आश्रमशाळांपैकी काही शाळा या विद्यार्थी संख्या व भौतिक सुविधा अभावी बंद करण्यात आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या शाळेतील शिक्षकांचे समायोजन न झाल्याने त्यांचे वेतन गेली ४ ते ५ वर्षे बंद करण्यात आले आहे, तसेच या आश्रमशाळेतील शिक्षकांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका दाखल केली असून या शिक्षकांचे इतर शाळेत समायोजन करून वेतन सुरू करण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार राज्यातील अशा १०० शिक्षकांनी त्यांना इतर शाळेत समायोजन करून वेतन सुरू करणेबाबत शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या शिक्षकांचे इतर शाळेत समायोजन करून त्यांचे वेतन सुरू करणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१६-०१-२०१९) :** (१) होय.

(२) मा.उच्च न्यायालयाने प्रकरण परत्वे वेगवेगळे निकाल दिलेले आहेत. तसेच मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांचे अन्य आश्रमशाळेत समायोजन होईपर्यंत वेतन अदा न करण्याचे निर्देशही काही न्यायालयीन प्रकरणी दिले आहेत.

(३) अंशत: खरे आहे.
(४) प्रचलित नियमानुसार कार्यवाही करण्यात येत आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे लाखखींड (ता.दारव्हा, जि.यवतमाळ) येथील अंदाजपत्रकात त्रुटी आढळून आल्याबाबत

**(२३) ४०३७९ (०४-०४-२०१८). श्री.हरिसिंग राठोड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे लाखखींड (ता.दारव्हा, जि.यवतमाळ) येथील गट क्र. १/९ चे गाळ काढणे व नाला खोलीकरण कामाचे सविस्तर अंदाजपत्रकात त्रुटी आढळून आल्या, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर योजनेमध्ये अंदाजपत्रक वाढवून त्यास मंजुरी दिली असल्याने जवळपास ६०% अतिरिक्त रक्कम विनाकारण खर्ची पडल्याने शासनाचे करोडो रुपयांचे नुकसान झाले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषी अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२०-०२-२०१९) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.
(३) व (४) अधीक्षक कृषी अधिकारी, दक्षता पथक पुणे यांचे तपासणी अहवालानुसार यवतमाळ जिल्ह्यातील मौजे लाखखिंड, ता.दारव्हा येथील गट क्र.१/९ चे सिमेंट नाला बांधातील गाळ काढणे व नाला खोलीकरण करणे या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकामध्ये त्रुटी आढळून आलेल्या आहेत. त्यानुषंगाने यवतमाळ जिल्ह्यात झालेल्या सिमेंट नाला बांधातील गाळ काढणे व नाला खोलीकरणाच्या सर्व कामांची तपासणी करण्यासाठी जिल्हा

अधीक्षक कृषी अधिकारी, वाशिम यांची चौकशी अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आली असून चौकशीची कार्यवाही प्रगतीत आहे. चौकशी अहवाल प्राप्त होताच चौकशी अहवालानुसार संबंधितांवर नियमानुसार पुढील योग्य ती कारवाई करण्यात येईल.

---

## राज्यात सामाजिक बहिष्कार कायद्यांतर्गत दाखल केलेल्या गुन्हयाबाबत

**(२४) ४०५४३ (०६-०४-२०१८). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.ख्वाजा बेग, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.रामराव वडकुते, ॲड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात दिनांक ३ जुलै, २०१७ रोजीपासून अंमलबजावणी सुरु असलेल्या सामाजिक बहिष्कार कायद्यांतर्गत विविध पोलीस स्टेशनमध्ये १५ गुन्हे दाखल झाले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त गुन्हे कोणकोणत्या कारणासाठी दाखल करण्यात आले आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

राज्यात दिनांक ३ जुलै, २०१७ पासून ते मार्च, २०१८ पर्यंत सामाजिक बहिष्कार कायद्यांतर्गत विविध पोलीस स्टेशनमध्ये २३ गुन्हे दाखल आहेत.

(२) जात पंचायतीस विरोध केला म्हणून कुटुंबास जातीतून बहिष्कृत करणे, कुटुंबावर सामाजिक, आर्थिक व धार्मिक बहिष्कार घालून समाजातून वाळीत टाकणे, समाजातील जाती बाहेरील मुलीशी विवाह केला म्हणून समाजात सभासदत्व दिले नाही, धार्मिक कार्यक्रमामध्ये सहभागी होणेस विरोध करणे,

समाजातील होणारे विविध कार्यक्रमाचे व विधीचे निमंत्रण नाकारून समाजाकडून कोणतेही सहकार्य न होणे व इतर इत्यादी कारणास्तव फिर्यादीने दिलेल्या तक्रारीवरून संबंधित पोलीस ठाण्यामध्ये महाराष्ट्र सामाजिक बहिष्काकारापासून व्यक्तींचे संरक्षण अधिनियम २०१६ अंतर्गत गुन्हे दाखल करण्यात आले आहे.

(३) सामाजिक बहिष्कारापासून व्यक्तींचे संरक्षण अधिनियम, २०१६ अन्वये खालीलप्रमाणे गुन्हे दाखल करण्यात आले आहे.

| **अ.क्र.** | **गुन्हा नोंद असलेले पो.स्टे.** | **गुन्हा क्र.** | **गुन्ह्यात नोंदविलेले कलमे.** |
|---|---|---|---|
| १. | नगर तालुका पोलीस ठाणे, अहमदनगर. | २४०/२०१७ | भादंवि कलम ३८४, सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(२)(३). |
| २. | वैभववाडी पोलीस ठाणे, सिंधुदुर्ग. | ८१/२०१७ | भादंवि कलम ३८४, सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(३)(४)(८)(१०)(१२)(१५)(१६), ४, ५, ६, ७. |
| ३. | कुडाळ पोलीस ठाणे, सिंधुदुर्ग. | १८९/२०१७ | सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(३)(४)(६), ४, ५. |
| ४. | उस्मानाबाद शहर पोलीस ठाणे, उस्मानाबाद. | २२७/२०१७ | भादंवि कलम ३८४, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ५ व ६. |
| ५. | ढोकी पोलीस ठाणे, उस्मानाबाद. | २०६/२०१७ | भादंवि कलम ३८४, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ४, ५. |

| | | | |
|---|---|---|---|
| ६. | खडक पोलीस ठाणे, पुणे शहर. | ३८५/२०१७ | भादंवि कलम ३८५, ५००, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३ (८)(१५),५. |
| ७. | खडकी पोलीस ठाणे, पुणे शहर. | ३१८५/ २०१७ | भादंवि कलम ३८४, सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(३)(४)(८)(१०)(१२)(१५)(१६), ४, ५, ६, ७. |
| ८. | सांगली पोलीस ठाणे, सांगली. | ४६/२०१७ | सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(३)(६) ५. |
| ९. | जुन्नर पोलीस ठाणे, पुणे ग्रामीण | १९८/२०१७ | भादंवि कलम ५०६, सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(४). |
| १०. | लष्कर पोलीस ठाणे, पुणे शहर. | २३०/२०१७ | भादंवि कलम ३८४, ३२३, ५०४, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(२)(४)(५)(१५). |
| ११. | संगमेश्वर पोलीस ठाणे, रत्नागिरी. | ८८/२०१७ | भादंवि कलम १२०(ब), सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(३)(४)(८)(१०)(१५). |
| १२. | नळदूर्ग पोलीस ठाणे, उस्मानाबाद. | २६८/२०१७ | भादंवि कलम ३८४,३२३, ५०४,५०६,३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ४, ५. |
| १३. | उपनगर पोलीस ठाणे, नंदुरबार. | २२६/२०१७ | भादंवि कलम ३२३, ५०४, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(३)(६),५. |
| १४. | जयगड पोलीस ठाणे, रत्नागिरी. | ४०/२०१७ | भादंवि कलम ३२३, ५०४, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(२)(४)(५)(६)(८)(९)(१२)(१५). |

| | | | |
|---|---|---|---|
| १५. | महाबळेश्वर पोलीस ठाणे, सातारा. | ८८/२०१७ | भादंवि कलम ५०४, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३, ५. |
| १६. | दापोली पोलीस ठाणे, रत्नागिरी. | २१५/२०१७ | सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३, ४, ५, ६. |
| १७. | पोयनाड पोलीस ठाणे, रायगड. | १४४/२०१७ | भादंवि कलम १५३ अ, ५०६, ३८४, ३८५, ३७९, १२० ब, ३४. |
| १८. | लोणावळा ग्रामिण पोलीस ठाणे, पुणे ग्रामिण. | १९१/२०१७ | भादंवि कलम ३०७, ३४२, ३६५, १४१, १४३, १४९, ५०४, ५०६ सह भारतीय हत्यार कायदा कलम ३, २५ सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३ (८), ४, ५, ७. |
| १९. | चिपळून पोलीस ठाणे, रत्नागिरी. | ०६/२०१८ | भादंवि कलम १५३ अ, ५०६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ४, ५, ६ व ७. |
| २०. | इतवारा पोलीस ठाणे, नांदेड. | ३३/२०१८ | भादंवि कलम ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(१)(२)(४)(८), ४, ५, ७. |
| २१. | धानोरा पोलीस ठाणे, गडचिरोली. | १२/२०१८ | भादंवि कलम ३७६, ५०६, २०२, ३४ सह पोक्सो कायदा कलम ४,६, २१(अ), सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३(४)(१२)(१३). |
| २२. | त्र्यंबकेश्वर पोलीस ठाणे, नाशिक ग्रामिण. | ०२/२०१८ | भादंवि कलम १७६, ३४ सह सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ३, ५, ७. |

| | | | |
|---|---|---|---|
| २३. | महाड एमआयडीसी पोलीस ठाणे, रायगड. | २१/२०१८ | सामाजिक बहिष्कार प्रतिबंधक अधिनियम कलम ५, ६, ७. |

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महिला कामगारांना विशेष रजा देण्याबाबत

**(२५) ४०९२१ (०६-०४-२०१८). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महिला कामगारांना रात्रपाळीत मासिक पाळी आल्यास विशेष रजा देण्याची तरतूद महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे सेवाशर्तीचे विनियमन) अधिनियम, २०१७ मध्ये करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हे लाभ दिवसा काम करणाऱ्या महिला कर्मचारी तसेच शिक्षिकांना लागू असणार आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासन आदेश निर्गमित केला आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२९-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे व सेवाशर्तीचे विनियमन) अधिनियम, २०१७ या अधिनियमांतर्गत तयार करण्यात आलेल्या महाराष्ट्र दुकाने व आस्थापना (नोकरीचे सेवाशर्तीचे विनियमन) नियम, २०१८ च्या पोटनियम १३(२)(iv) मध्ये उक्त अधिनियमाच्या कलम १८ अन्वये अनुज्ञेय असलेल्या रजे व्यतिरिक्त, आस्थापनेतील पाळ्यांच्या नियोजनाप्रमाणे महिला कामगारांनी रात्रपाळीत काम केल्यास, अशा प्रत्येक महिला कामगारांस एका वर्षात, प्रत्येक दोन महिन्यांकरीता एक दिवस याप्रमाणे अतिरिक्त भरपगारी रजा तरतूद आहे.

(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अंधेरी "के" वार्ड मध्ये एम.ए रोड जंक्शन ते नाडको शॉपिंग सेंटर रस्ता रुंदीकरणाबाबत

**(२६) ४१२२० (०६-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अंधेरी "के" वॉर्ड मध्ये एम.ए.रोड जंक्शन ते नाडको शॉपिंग सेंटर पर्यंत १११ फुट रस्ता रुंदीकरण करण्याचे प्रस्तावित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाडको शॉपिंग सेंटर ते अंधेरी स्टेशन चौक व त्यापुढे अंबोली पर्यंत वाहतूक मोठ्या प्रमाणात असून देखील ९० फुटी रस्ता मुंबई महानगरपालिकेतर्फे प्रस्तावित केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अंधेरी येथे पश्चिम रेल्वे व मेट्रो रेल्वेचे जंक्शन असून देखील जाणीवपूर्वक काही विकासकांना फायदा देण्याकरीता रस्त्याची रुंदी १११ फुट ऐवजी फक्त ९० फुट ठेवली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर प्रकरणात जाणीवपूर्वक अंधेरी स्टेशन (पश्चिम) चौक रस्त्यांची रुंदी ९० फुट केल्याबद्दल संबंधित दोषी महानगरपालिकेच्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) नाडको शॉपिंग सेंटर ते अंधेरी स्टेशन चौकपर्यंत रस्तारेषा २७.४५ मी. असून, सदर बाबतचे रुंदीकरण करण्यात आले आहे.

तसेच, जे.पी. रोडपासून ते अंबोली सिझर रोडपर्यंतचे रुंदीकरण प्रगतीपथावर असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) ही बाब खरी नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील कामगार रुग्णालयांची दूरवस्था झाल्याबाबत

**(२७) ४१३८२ (०२-०८-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील कामगारांना आरोग्य सुविधा पुरविणारी व जीवनदायी ठरणारी कामगार रुग्णालये केंद्र शासन आणि राज्य शासनाच्या उदासिन धोरणामुळे दूरवस्थेत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कामगार रुग्णालयांच्या परिस्थितीमध्ये सुधारणा करण्याकरीता शासनाने कोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहेत,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२६-१२-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

राज्य कामगार विमा योजनेवर राज्य व केंद्र शासन असे दुहेरी नियंत्रण आहे. त्यामुळे राज्य शासनास सदर योजनेवर प्रथम संपूर्ण खर्च करावा लागतो व ७:१ प्रमाणात त्याची प्रतिपुर्ती मिळते. अपुऱ्या निधी अभावी रुग्णालय इमारतींची विशेष दुरुस्ती, रिक्त पदे भरणे, नविन वैद्यकीय उपकरणे व यंत्रसामुग्री खरेदी इत्यादी महत्वाच्या धोरणात्मक बाबी प्रलंबित राहतात.

(२) राज्य कामगार विमा योजनेमार्फत पुरविण्यात येणाऱ्या वैद्यकीय सेवा व सुविधा अधिक परिणामकाररित्या पुरविता याव्यात. याकरीता मा.राज्य मंत्रिमंडळाने दिनांक २४/०४/२०१८ रोजी राज्य कामगार विमा योजनेकरीता सोसायटी स्थापन करण्याबाबत निर्णय घेतला आहे. सदर सोसायटी स्थापीत झाल्यास राज्य कामगार विमा महामंडळाकडून थेट निधी जमा होणार आहे. त्यानुषंगाने सोसायटी स्थापन करण्याबाबत दिनांक ०५ मे, २०१८ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अंगणवाडी बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत

**(२८) ४१५१४ (०१-०८-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८७२९ ला दिनांक ६ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद जिल्ह्यामध्ये १२०४ गावे असून सद्य:स्थितीत ३३५६ अंगणवाड्या कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ० ते ३ वर्ष वयोगटातील बालकांना पुरक पोषण आहार देऊन कुपोषण रोखण्याचा प्रयत्न केला जातो तसेच गर्भवतीचे आरोग्य चांगले राहावे त्यांना आरोग्य विषयक समस्या सोडविण्यासाठी मार्गदर्शन मिळावे व किशोरवयीन मुलींना आरोग्य विषयक मार्गदर्शन मिळण्याच्यादृष्टीने अंगणवाड्या कार्यरत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, औरंगाबाद जिल्ह्यातील ३३५६ अंगणवाड्यापैकी २४२५ अंगणवाड्यांना स्वत:च्या इमारती असून ८०० अंगणवाड्या ह्या भाड्याच्या जागेवर चालविल्या जात असल्याने तेथे त्यांना शौचालय, स्वतंत्र स्वयंपाक घर व आरोग्य सुविधांचा अभाव असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, ८०० अंगणवाड्याच्या बांधकामासाठी रुपये ४८ कोटी निधी मिळावा म्हणून आयुक्त, एकात्मिक बालविकास यांचेकडे प्रस्ताव पाठवला परंतु त्यावर कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२१-०२-२०१९) :** (१) औरंगाबाद जिल्ह्यात एकूण ३५०६ अंगणवाडी केंद्र मंजूर आहेत व ३४६१ अंगणवाडी केंद्र कार्यरत आहेत.

(२) हे खरे आहे.

अंगणवाड्यात ० ते ३ वर्ष वयोगटातील बालकांना पूरक पोषण आहार देऊन कुपोषण रोखण्याचा तसेच गर्भवती माता व किशोरवयीन मुलींना आरोग्य विषयक मार्गदर्शन मिळण्याच्यादृष्टीने अंगणवाड्या कार्यरत आहेत.

(३) औरंगाबाद जिल्ह्यातील ३५०६ अंगणवाड्यांपैकी २४६१ अंगणवाड्यांना स्वत:च्या इमारती असून २५० अंगणवाड्या या भाड्याच्या जागेवर चालवल्या जात असून उर्वरित अंगणवाडी केंद्र शेजारची अंगणवाडी, शाळा खोली, समाजमंदिर, ग्रामपंचायत इ. ठिकाणी भरविण्यात येतात त्या ठिकाणी शौचालय व आरोग्य सुविधा इ. सुविधा पुरविल्या जातात.
(४) व (५) आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवायोजना मुंबई यांचेकडुन संपूर्ण राज्यात किती ठिकाणी अंगणवाडी बांधकामासाठी जागा उपलब्ध आहेत याची आढावा घेण्यात येत आहे. सर्व माहिती संकलित झाल्यानंतर सर्व जिल्हयांना त्याप्रमाणे उपलब्ध असलेल्या निधीतून अंगणवाडी बांधकामासाठी निधी वितरीत करण्यात येईल. याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## भोसरी (जि.पुणे) येथील महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळाच्या भूखंड खरेदीप्रकरणी झालेल्या गैरव्यवहाराची चौकशी करण्याबाबत

**(२९) ४१६८४ (०२-०८-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.जनार्दन चांदूरकर, डॉ.सुधीर तांबे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भोसरी (जि.पुणे) येथील महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या (एमआयडीसी) भूखंड खरेदी प्रकरणी सुमारे दोन वर्षापूर्वी माजी महसूल मंत्री यांचेवर झालेल्या आरोपांच्या तक्रारीच्या अनुषंगाने त्यांची लाचलुचपत प्रतिबंध विभागाने (एसीबी) सुरु केलेली चौकशी पूर्ण करुन त्याबाबत सविस्तर अहवाल दिनांक १ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास सादर केलेला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अहवालाचे स्वरुप काय आहे, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) तक्रारदार श्री.हेमंत गावंडे यांचे फिर्यादीनुसार श्री.एकनाथ गणपराव खडसे, सौ. मंदाकिनी एकनाथ खडसे, श्री.गिरीष दयाराम चौधरी व श्री.अब्बास रसुलभाई उकानी यांचेविरूध्द दिनांक १०/०४/२०१७ रोजी बंडगार्डन पोलीस स्टेशन, पुणे शहर येथे गु.रं.नं. १२१/२०१७, ला.प्र.का. कलम १३(१)(ड) सह १३ (२), १५ व भादंवि क १०९ प्रमाणे दाखल करण्यात आलेला होता.

सदर गुन्हयात तपासाअंती श्री.एकनाथ खडसे व इतर ३ यांचेविरूध्द सबळ पुरेसा व विश्र्वासार्ह पुरावा उपलब्ध झाला नाही. त्यामुळे सदर गुन्हयात दिनांक २७/०४/२०१८ रोजी 'क' वर्ग समरी मंजूर होणेकामी मा.विशेष न्यायाधिश, विशेष न्यायालय, शिवाजीनगर, पुणे यांचे न्यायालयात अहवाल सादर करण्यात आलेला आहे. सदरचे प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

---

## शासकीय मुद्रणालयातील छपाई केलेल्या राष्ट्रपुरुषांच्या प्रतिमांना जीएसटी आकारणीबाबत

**(३०) ४२४२७ (०५-०६-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने शासकीय मुद्रणालयातील छपाई केलेल्या राष्ट्रपुरुषांच्या प्रतिमांना जीएसटी आकारणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील शासकीय मुद्रणालयातील ग्रंथालयामध्ये विद्यमान राष्ट्रपती, पंतप्रधान, प.दीनदयाळ उपाध्याय यांच्या प्रतिमा लावण्यात आल्या असून माजी पंतप्रधान लाल बहादूर शास्त्री, इंदिरा गांधी यांच्या प्रतिमा या ठिकाणी लावण्यात आल्या नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासनाने शासकीय मुद्रणालयातील महापुरुषांच्या प्रतिमांना जीएसटी मुक्त करण्यासोबतच कोल्हापूर येथील शासकीय मुद्रणालयात सदर माजी पंतप्रधानाच्या प्रतिमा लावण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०९-०७-२०१८) :** (१) वस्तू व सेवाकर कायद्यानुसार राष्ट्रपुरुषांच्या प्रतिमांना वस्तू व सेवाकराची आकारणी करण्यात आलेली आहे.

(२) व (३) शासकीय ग्रंथागार कोल्हापूर येथे विद्यमान राष्ट्रपती, पंतप्रधान, पं.दीनदयाळ उपाध्याय तसेच माजी पंतप्रधान लाल बहादूर शास्त्री व इंदिरा गांधी यांच्या प्रतिमा लावण्यात आलेल्या आहेत.

(४) लागू नाही.

---

## पाटोदा (ता.पाटोदा, जि.बीड) येथील ग्रामीण रुग्णालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांवर गुन्हा दाखल करण्याबाबत

**(३१) ४२४७६ (०२-०८-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पाटोदा (ता.पाटोदा, जि.बीड) येथील नानाभाऊ श्रीजगन्नाथ लऊळ यांना छातीमध्ये वेदना होत असल्यामुळे ग्रामीण रुग्णालयात दाखल करण्यात आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर ग्रामीण रुग्णालयात वैद्यकीय अधिकारी उपस्थित नसल्यामुळे श्री.लऊळ यांचा मृत्यू झाला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, रुग्ण दगावल्यामुळे नातेवाईकांनी संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांवर गुन्हा नोंदवा त्यानंतरच मृतदेह ताब्यात घेवु असा पवित्रा घेतला, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२२-०२-२०१९) :** (१) होय. तथापि, रूग्ण नानाभाऊ श्रीजगन्नाथ लऊळ यांना ग्रामीण रूग्णालयात दाखल करतेवेळी ते मृतावस्थेत होते.

(२) नाही, सदर रूग्णालयात आयुष वैद्यकीय अधिकारी उपस्थित होते.
(३) नाही, मयताचे शवविच्छेदन ग्रामीण रूग्णालयात करण्यात आले व मृतदेह नातेवाईकांच्या ताब्यात देण्यात आला.
(४) व (५) होय, तत्कालीन वैद्यकीय अधीक्षकाचे कामकाजात नियंत्रण नसल्याचे निदर्शनास आल्याने त्याचा कार्यभार काढून घेण्यात आला असून तो अन्य अधिकाऱ्याकडे सोपविण्यात आला आहे. तसेच कार्यालयातील अनुपस्थित वैद्यकीय अधिकाऱ्यांची दिनांक १८/०३/२०१८ ची अनुपस्थिती विनावेतन करण्यात आली आहे.

---

## मौजे रणाईचे (ता.अमळनेर, जि.जळगांव) ग्रामपंचायतीचे विभाजन करून रणाईचे तांडा नविन ग्रामपंचायत स्थापन करण्याबाबत

**(३२) ४३८७३ (०२-०८-२०१८). श्रीमती स्मिता वाघ** : सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे रणाईचे (ता.अमळनेर, जि.जळगांव) येथील ग्रामपंचायतीचे विभाजन करून रणाईचे तांडा नविन ग्रामपंचायत कार्यालय स्थापन करण्याचा प्रस्ताव ग्रामविकास विभागाकडे प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रस्ताव प्रलंबित असल्याची कारणे व प्रस्तावाची सद्य:स्थिती काय आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मौजे रणाईचे ग्रामपंचायतीचे विभाजन करून रणाईचे तांडा नविन ग्रामपंचायत कार्यालय स्थापन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१३-०२-२०१९) :** (१), (२) व (३) ग्रुप ग्रामपंचायत रणाईचे बु.,ता.अमंळनेर, जि.जळगांव चे विभाजन करुन रणाईचे खुर्द या महसूली गावी स्वतंत्र ग्रामपंचायत स्थापन करणेबाबतचा प्रस्ताव विभागीय आयुक्त,

नाशिक विभाग यांचेमार्फत दिनांक ३१/०१/२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला होता.

शासन निर्णय, क्र. व्हीपीएम २६०३/प्र.क्र. १५४४/पं.रा.४ (२२), दिनांक १२ फेब्रुवारी, २००४ तसेच, शासन निर्णय, क्र. व्हीपीएम २०११/प्र.क्र. १९१/पंरा-४, दिनांक ०४ मार्च, २०१४ मधील सूचना विचारात घेऊन ग्रामपंचायत स्थापनेकरीता भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २४३ च्या खंड (छ) व महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम (सन १९५९ चा अधिनियम ३) कलम ४ अन्वये गाव जाहीर करण्यात येते.

वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक १५ एप्रिल, २०१७ नुसार राज्याच्या वित्तव्यवस्थेवर परिणाम होईल किंवा शासनावर वित्तीय भार येणार असेल अशा प्रकरणात प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाशी विचारविनिमय करुन तसेच वित्त विभागाची पुर्वसंमती घेऊन कार्यवाही करण्याबाबतच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

सदर प्रस्तावास शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०१७/प्र.क्र.०३/विनियम, दिनांक १५ एप्रिल, २०१७ अन्वये वित्त विभागाची मान्यता प्राप्त झालेली नाही. त्यामुळे सदर प्रस्ताव दिनांक १३ ऑगस्ट, २०१८ अन्वये विभागीय आयुक्त, नाशिक विभाग यांना परत पाठविण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील लॉड्रीचा व्यवसाय करणाऱ्यांना औद्योगिक क्षेत्रात आणून सवलतीत वीज पुरवठा करण्याचा निर्णय घेतल्याबाबत

**(३३) ४४१९१ (०५-१२-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील लॉड्रीचा व्यवसाय करणाऱ्यांना औद्योगिक क्षेत्रात आणून सवलतीत वीज पुरवठा करणार असल्याचा निर्णय माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या निर्णयाचे स्वरुप काय आहे व या निर्णयाची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१४-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) या निर्णयाची अंमलबजावणी दिनांक १ सप्टेंबर, २०१८ पासून करण्यात आली असून लाँड्री व्यवसाय करणाऱ्या ग्राहकांना औद्योगिक वर्गवारीच्या वीज दराने आकारणी करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या कोट्यवधी रुपयांचा निधी अखर्चित असल्याबाबत

**(३४) ४४३०६ (०५-१२-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.जनार्दन चांदूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांना सन २०१४-१५ व सन २०१५-१६ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या कोटयवधी रुपयांचा निधी अखर्चित असून नगरविकास विभागाने माहे जून, २०१८ पर्यंत निधी खर्चाचे आदेश दिल्यानंतरही सदर निधी खर्च करण्यात प्रशासनास अपयश आले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील नगरपालिकांना दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ ची अंतिम मुदतवाढ नगरविकास विभागाने दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली व त्याबाबतचा तपशील काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१८-०२-२०१९) :** (१), (२) व (३) दिनांक १२ मार्च, २०१८ च्या शासन निर्णया अन्वये २०१४-१५ व २०१५-१६ या वित्तीय वर्षात राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती यांना नगरविकास विभागामार्फत वितरीत करण्यात आलेला व अखर्चित असलेला निधी खर्च करण्यास दिनांक ३० जून,२०१८ पर्यंत मुदत देण्यात आलेली होती.

दिनांक ९ ऑगस्ट, २०१८ च्या शासन निर्णया अन्वये सन २०१४-१५ व २०१५-१६ या वित्तीय वर्षात राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती यांना नगरविकास विभागामार्फत वितरीत करण्यात आलेला तथापी अद्याप अखर्चित असलेल्या निधीमधील ज्याठिकाणी दिनांक ३० जून, २०१८ पुर्वी कार्यारंभ आदेश देण्यात आलेला आहे, असा निधी खर्च करण्यास दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात आलेली होती.

तथापि, दिनांक १५ डिसेंबर, २०१८ च्या शासन निर्णया अन्वये सन २०१४-१५, सन २०१५-१६ व सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती यांना नगरविकास विभागामार्फत वितरीत करण्यात आलेला व अद्याप अखर्चित असलेला निधी खर्च करण्यास दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील मेयो, मेडीकल, सुपरस्पेशालिटी रूग्णालयात गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डसाठी रुग्णांचा रक्तदाब तपासण्यात आल्याबाबत

**(३५) ४४७८७ (०५-१२-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दिनांक २४ सप्टेंबर, २०१८ रोजी नागपूरातील मेयो, मेडीकल, सुपरस्पेशालिटी रूग्णालयात गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डसाठी एका तासात ७२० रूग्णांचा रक्तदाब तपासण्यात आला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, एका तासात ६० मिनिटे या प्रमाणे १ मिनिटात ४ रूग्णांचे रक्तदाब तपासण्यात आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१८-०२-२०१९) :** (१) नागपूर येथील मेयो, मेडिकल व सुपरस्पेशालिटी या तीन रुग्णालयांकडून एकूण ५८४ रुग्णांचे रक्तदाब तपासणी करण्यात आली आहे.
(२) हे खरे नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) लागू नाही.

---

## पुसद (जि.यवतमाळ) वनपरिक्षेत्रांतर्गत जिओ केबलकरीता, राखीव वनात शासनाची पूर्व परवानगी न घेता खोदकाम केल्याबाबत

**(३६) ४४८४० (०५-१२-२०१८). श्री.हरिसिंग राठोड : तारांकित प्रश्न क्रमांक ४१२६४ ला दिनांक १२ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्ह्यात पुसद वनपरिक्षेत्रांतर्गत जिओ केबलकरीता, राखीव वनात शासनाची पूर्व परवानगी न घेता खोदकाम केल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर खोदकाम दिनांक २४ जुलै, २०१७ रोजी करून खोदकामाची परवानगीकरीता दिनांक २७ जुलै, २०१७ रोजी प्रस्ताव सादर केला व त्या प्रस्तावास दिनांक १९ सप्टेंबर, २०१७ रोजी शासनाची परवानगी मिळाली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शासनाची परवानगी माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये मिळाल्याचे स्पष्ट आदेश असतानाही माहे जुलै, २०१७ मध्ये पूर्वपरवानगी न घेता, वन जमीन संवर्धन कायदा १९८० चा भंग करून सदर खोदकाम केले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शासनाची पूर्व परवानगी न घेता खोदकाम करू देणाऱ्या उपवनसंरक्षक व संबंधित अधिकारी व कर्मचारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१८-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ यांनी दिनांक १२/०५/२०१७ रोजीच्या पत्रान्वये मे.रिलायन्स जिओ इन्फोकॉम लिमिटेड, नागपूर यांना ऑप्टीकल फायबर केबल टाकण्यासाठी पुसद वनविभागातील राखीव वनजमीन वळतीकरणाचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयास सादर केला होता. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर प्रस्तावातील त्रुटींच्या पूर्ततेनंतर दिनांक २७/०७/२०१८ पत्रान्वये प्रस्ताव राज्य शासनास सादर केला होता. राज्य शासनाने दिनांक ११/०९/२०१७ रोजीच्या आदेशान्वये प्रस्तुत प्रकरणी वनजमीन वळतीकरणास तत्वत: मान्यता प्रदान केली.

प्रकल्प यंत्रणेने शासनाची मंजूरी मिळण्यापूर्वी दिनांक २५/०७/२०१७ रोजी खोदकाम केल्याचे निदर्शनास आले आहे. त्यानुषंगाने चौकशी करून भारतीय वन अधिनियम, १९२७ चे कलम २६(१) अंतर्गत कंत्राटदाराविरूध्द वनगुन्हा नोंदविण्यात आला आहे. सदर प्रकरण सद्य:स्थितीत मा.सत्र न्यायालय, पुसद येथे न्यायप्रविष्ट आहे. केंद्र शासनाने वनभंगाच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या दिनांक २९/०१/२०१८ रोजीच्या मार्गदर्शक सूचनांस अनुसरून प्रकल्प यंत्रणेकडून वनभंगाकरीता दंडात्मक रक्कम, नक्त वर्तमान मूल्य (Net Present Value) व त्यावर १२% व्याज अशी एकूण रुपये १,११,५२१/- इतकी रक्कम वसूल करण्यात आली आहे.

तसेच वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग झाल्यामुळे संबंधित क्षेत्राचे वनरक्षक व क्षेत्रसहाय्यक यांचेवर शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात आली आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## डहाणू (जि.पालघर) येथील समुद्र किनाऱ्यावरील पर्यटन स्टॉलची दुरवस्था झाल्याबाबत

**(३७) ४४८८३ (०५-१२-२०१८). श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्ह्यात डहाणू नगरपरिषदेने पर्यटनाला चालना मिळण्यासाठी व स्थानिकांना रोजगार मिळण्यासाठी समुद्र किनाऱ्यांवर पर्यटन स्टॉल उपलब्ध करुन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, डहाणू नगरपरिषदेने याकडे दुर्लक्ष केल्यामुळे अनेक स्टॉल मोडकळीस आले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१८-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना मूलभूत सोयीसुविधा या घटकांतर्गत सदरची स्टॉल्स बांधण्यात आली असून ती फक्त महिला बचतगटांना भाडेतत्वावर उपलब्ध करून द्यावयाची आहेत.

त्यानुषंगाने डहाणू नगरपरिषदेमार्फत अनेकवेळा जाहिरात देऊनही त्यास महिला बचतगटांकडून अपेक्षित प्रतिसाद मिळाला नाही.

सबब, सदर स्टॉल्स हे उपयोगात नसल्याने ते काही प्रमाणात नादुरूस्त झाले, ही वस्तुस्थिती आहे.

(३) सदर स्टॉल्स भाडेतत्वावर देण्याच्या अनुषंगाने नगरपरिषदेमार्फत महिला बचत गटांशी पुनश्च: पत्र व्यवहार करण्यात आला असून इच्छुक महिला बचतगटांकडून अर्ज मागविण्यात आले आहेत.

अर्ज प्राप्त झाल्यानंतर सदर स्टॉल्स ची आवश्यक ती दुरूस्ती करून भाडे तत्वावर देण्याबाबत कार्यवाही करण्याचे नगरपरिषदेचे नियोजन असल्याचे नगरपरिषदेच्या अहवालात नमूद आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विद्युत रोहित्र देण्यास टाळाटाळ करीत असल्याबाबत

**(३८) ४४९७८ (०५-१२-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्ह्यातील अनेक तालुक्यातील रोहित्र जळाली असल्याने ती जमा करूनही नविन रोहित्र बसवून देण्यास महावितरण टाळाटाळ करीत असल्याने शेतकऱ्यांच्या पिकांचे बऱ्याच प्रमाणात नुकसान झाल्याची बाब माहे जुलै, २०१८ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तसेच संबंधितांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०२-२०१९) :** (१) नांदेड जिल्ह्यात अनेक तालुक्यात रोहित्र नादुरुस्त झालेली होती. रोहित्रांच्या उपलब्धतेप्रमाणे रोहित्रे बदलून देण्यात आली आहेत.

(२) नांदेड जिल्ह्यात माहे एप्रिल, २०१८ ते जुलै, २०१८ या कालावधीमध्ये कृषीपंपाचे ४३३ रोहित्र नादुरुस्त झाले होते. यापैकी ३९५ रोहित्र उपलब्धतेनुसार व विभागस्तरीय ज्येष्ठता यादीनुसार बदलण्यात आले. उर्वरीत ३८ रोहित्रे जुलै, २०१८ नंतर त्वरीत बदलण्यात आली. तसेच माहे ऑगस्ट, २०१८ ते नोव्हेंबर, २०१८ या कालावधीमध्ये १२०२ रोहित्र नादुरुस्त झाले. त्यापैकी १०८८ रोहित्र उपलब्धतेनुसार व विभागस्तरीय ज्येष्ठता यादीनुसार बदलण्यात आले व उर्वरीत ११४ रोहित्र बदलण्याचे काम प्रगतीपथावर आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## समुद्रापासून संरक्षण करण्यासाठी योजना कार्यान्वित करण्याबाबत

**(३९) ४५१२५ (३०-११-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २०१८ च्या पावसाळ्यात समुद्राच्या अतिक्रमणापासून संरक्षण करण्यासाठी शासनामार्फत कोणकोणत्या योजना आखण्यात आलेल्या आहेत, त्यापैकी किती योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत,

(२) असल्यास, या कामासाठी आणखी काही योजना शासनाच्या विचाराधीन आहेत काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-०२-२०१९) :** (१) समुद्राच्या अतिक्रमणापासून संरक्षण करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत "४७११, पुर नियंत्रण प्रकल्प यावरील भांडवली खर्च, समुद्र धुपप्रतिबंधक बांधकाम" या योजनेंतर्गत नवीन धुपप्रतिबंधक बंधारे बांधले जातात. तसेच ३०५१ बंदरे व दिपगृहे, मूळ लहान बांधकामे, १०१ बांधकाम व दुरुस्ती, (००)(०१) स्थापत्य विषयक बांधकामे व ३०५१ बंदरे दिपगृहे (००) परिरक्षण व दुरुस्ती (००)(०२) स्थापत्य विषयक बांधकामाची दुरुस्ती या योजनेंतर्गत अस्तित्वातील बंधाऱ्यांची दुरुस्ती केली जाते. तसेच १३ वा वित्त आयोग या योजनेंतर्गत धुपप्रतिबंधक बंधाऱ्याची कामे केली जातात.

(२) उपरोक्त नमूद सर्व योजना कार्यान्वित आहेत.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई-विरार मनपा क्षेत्रात वीज पुरवठा करण्याबाबत

**(४०) ४५१२६ (०५-१२-२०१८). श्री.रविंद्र फाटक, ॲड.अनिल परब, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई-विरार महानगरपालिका क्षेत्रास प्रत्यक्षात किती विद्युत पुरवठा होत आहे व किती वीज पुरवठ्याची आवश्यकता आहे,

(२) असल्यास, अपुरा वीज पुरवठा होत असून पुरेसा व नियमित वीज पुरवठा व्हावा याकरीता शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०२-२०१९) :** (१) वसई-विरार महानगरपालिका क्षेत्रास प्रत्यक्षात मासिक सरासरी ३९० मेगा वॅट एवढी मागणी व ३९० मेगा वॅट इतका पुरवठा आहे. शहराची सद्य:स्थितीत विजेची असलेली मागणी पूर्ण होत आहे.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजनेबाबत

**(४१) ४५१८१ (०५-१२-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील २६ प्रकल्पांचा समावेश प्रधान मंत्री कृषी सिंचाई योजनेंतर्गत करण्यात आला असून या प्रकल्पाद्वारे सुमारे किती हेक्टर सिंचन क्षमता निर्माण होणार होती व त्याकरीता किती निधीची तरतूद करण्यात आली होती,

(२) असल्यास, सदर निधीमधून आतापर्यंत किती प्रकल्पांची कामे पूर्ण करण्यात आली व त्यामुळे किती सिंचनाची क्षमता निर्माण झाली आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-०२-२०१९) :** (१) प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजनेत समाविष्ट केलेल्या २६ प्रकल्पांमुळे सुमारे ५.५७ लाख हेक्टर सिंचन क्षमता निर्माण होणार आहे. दिनांक ०१/०४/२०१६ रोजी प्रकल्पांची एकूण उर्वरित किंमत रुपये १६६०३ कोटी (केंद्रीय हिस्सा रुपये ३८३० कोटी व राज्य हिस्सा रुपये १२७७३ कोटी) इतकी असून त्यासाठी प्रकल्पांच्या आवश्यकतेनुसार निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यात येते. सन २०१६-१७, २०१७-१८ व २०१८-१९ मध्ये अनुक्रमे रुपये ३६२४.८३ कोटी, रुपये ३४५४.०७ कोटी व रुपये ३९४५.३५ कोटी निधीची तरतूद करण्यात आली होती.

(२) जून, २०१८ अखेर चार प्रकल्प पूर्ण करण्यात आले असून या PMKSY योजनेंतर्गत १.२४ लाख हेक्टर सिंचन क्षमता निर्माण करण्यात आली आहे.
(३) उर्वरित प्रकल्प प्रगती पथावर असून ते टप्याटप्याने पूर्ण करण्याची कार्यवाही चालू असून डिसेंबर, २०२१ अखेर सर्व प्रकल्प पूर्ण होणे अपेक्षित आहे.

---

## राज्यामध्ये एम.एस.सी.आय.टी. प्रशिक्षण घेण्याची अट शिथिल करण्याबाबत

**(४२) ४५३०९ (०५-१२-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यामध्ये एम.एस.सी.आय.टी. प्रशिक्षण घेणे बंधनकारक असताना एम.एस.सी.आय.टी. प्रशिक्षण पूर्ण न केल्यामुळे अनेक शिक्षकांच्या निवृत्तीवेतन व वेतनातून कपात करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनेक शिक्षक कर्मचारी हे वयोमानाने ५५ वर्षाच्यावर असून अश्या कर्मचाऱ्यांना माहे मार्च, २०१९ पर्यंत प्रशिक्षण घेण्याची मुदत शासन देणार आहे काय, तसेच जे शिक्षक सेवानिवृत्त झाले अशा शिक्षकांना प्रशिक्षण घेण्याची अट शासन शिथिल करणार आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२२-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) व (३) ज्या अधिकारी / कर्मचाऱ्यांनी अद्याप एम.एस.सी.आय.टी. प्रशिक्षण पूर्ण केले नाही अशा अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षणास मुदतवाढ देण्याचा निर्णय अद्याप झालेला नाही. परंतु सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २०/११/२०१८ च्या पत्रान्वये अशा अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या वेतनाची वसुली करण्यास स्थगिती देण्यात आली आहे. त्यामुळे या विभागाच्या

दिनांक १६/०२/२०१९ रोजीच्या पत्रान्वये शिक्षण संचालक (प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांना सदर वसुलीस स्थगिती देण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिक्षक शुल्क प्रतिपूर्ती मिळणेबाबत

**(४३) ४५३२४ (०५-१२-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग, प्रकरण क्र. ७३, दिनांक १५ डिसेबर, २०१७, प्रकरण ५५९, दिनांक १५ एप्रिल २०१७, प्रकरण ५२४ दिनांक १७ मे, २०१८ या तिन्ही शासन निर्णयाची अंमलबजावणी झाली नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासन निर्णय ५६१, दिनांक १५ एप्रिल, २०१७ अन्वये ५० टक्के विद्यार्थी उपस्थिती अनिवार्य केली आहे. A.I.C.T.E. द्वारे Internship induction आणि Industrial Training यासाठी विद्यार्थ्यांना ६० पेक्षा जास्त दिवस महाविद्यालयात प्रात्येक्षिक करावी लागते त्यामुळे ही अट शासन शिथिल करणार आहे काय,
(३) असल्यास, शिक्षवृत्तीची D.B.T. योग्य आहे परंतु शिक्षण शुल्काच्या D.B.T. मुळे महाराष्ट्रात अनेक गुन्हेगारी प्रकरणे होतात त्यामुळे शासन शिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती सरळ महाविद्यालयाला शासन करेल काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१६-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) खरे आहे.
(३) नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबईतील विविध भागांमध्ये 'स्वतंत्र विद्युत पुरवठा' सबस्टेशन उभारण्याबाबत

**(४४) ४५६७४ (०५-१२-२०१८). श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबईतील तळवली गाव, गोठीवली, रबाळे, नौसिल नाका व घणसोली नोड येथील विविध भागांमध्ये 'स्वतंत्र विद्युत पुरवठा' सबस्टेशन उभारण्याबाबतचे निवेदन लोकप्रतिनिधींनी मा.ऊर्जा मंत्री महोदयांना दिनांक ९ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निवेदनावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व त्याचे थोडक्यात स्वरुप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) नवी मुंबईतील तळवली गाव, गोठीवली, रबाळे, नौसिल नाका व घणसोली नोड येथील विविध भागांमध्ये सुरळीत विद्युत पुरवठा करण्यासाठी घणसोली भागात स्वतंत्र सबस्टेशन उभारण्याबाबतच्या प्रस्तावास दिनांक १२/१०/२०१८ रोजी महावितरण कंपनीव्दारे मंजुरी देण्यात आली आहे. हे उपकेंद्र उभारण्यासाठी लागणाऱ्या जागेबाबत सिडको कार्यालयाकडे मागणी करण्यात आलेली आहे. सदर जागा प्राप्त झाल्यानंतर नवीन उपकेंद्र उभारण्यात येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद विभागात केंद्र शासनाच्या "सौभाग्य योजनेचे" बनावट लाभार्थी आढळून आल्याबाबत

**(४५) ४५९८२ (०५-१२-२०१८). श्री.विलास पोतनीस** : सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद विभागात केंद्र शासनाच्या अधिकाऱ्यांच्या पथकाने केलेल्या पाहणीत केंद्र शासनाच्या "सौभाग्य योजने" चे सुमारे ३२ हजार बनावट लाभार्थी आढळून आले असल्याचे दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले आणि सदर प्रकरणातील बनावट लाभार्थी आणि महावितरणच्या दोषी अधिकारी/कर्मचारी यांच्यावर शासनाकडून कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०२-२०१९)** : (१) हे खरे नाही. केंद्र शासनाच्या अधिकाऱ्यांच्या पथकाने औरंगाबाद परिमंडळांतर्गत कार्यान्वित केंद्र शासनाच्या सौभाग्य योजनेची पाहणी केलेली नाही. सौभाग्य पोर्टलनुसार दिनांक १९/१२/२०१८ रोजी औरंगाबाद परिमंडळांतर्गत औरंगाबाद जिल्ह्यात एकूण ४०६२१ इतक्या घरांचे व जालना जिल्ह्यात एकूण २००१२ इतक्या घरांचे विद्युतीकरण झालेले आहे. दिनांक ३१/१०/२०१८ च्या प्रगती अहवालानुसार सदर दोन्ही जिल्ह्यातील उद्दिष्ट १०० टक्के पूर्ण झाले आहे.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जव्हार (जि.पालघर) क्रांतीनगर येथील सांस्कृतिक भवनाचे काम अपूर्णावस्थेत असल्याबाबत

**(४६) ४६०५० (०५-१२-२०१८). श्री.आनंद ठाकूर** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जव्हार (जि.पालघर) नगरपरिषदेंतर्गत यशवंतनगर मोर्च्याजवळील क्रांतीनगर प्रभाग क्र. १ मध्ये सांस्कृतिक भवनाचे बांधकाम करण्यासाठी दलित सुधार योजना निधीतून दिनांक ११ डिसेंबर, २०१४ रोजी वा त्यासुमारास ३७ लाख ८६ हजार ७८१ रुपयांची मंजूरी दिली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुषंगाने दोषी असलेल्या ठेकेदाराविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१८-०२-२०१९) :** (१) जव्हार नगरपरिषदेच्या सर्व साधारण सभेने पारित केलेल्या ठरावानुसार नगरपरिषद हद्दीत दलित वस्ती सुधार योजनेतून सांस्कृतिक भवन बांधण्याच्या कामाकरीता अनुषंगिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर रुपये ४०,०३,१५८/- एवढ्या रकमेस दिनांक ०३/०३/२०१४ रोजी प्रशासकीय मान्यता प्रदान केली असल्याची वस्तुस्थिती जिल्हाधिकारी, पालघर यांच्या अहवालात नमूद आहे.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथे भूमिगत वीज वाहिन्या तुटल्यामुळे वीज पुरवठा खंडीत झाल्याबाबत

**(४७) ४६१४८ (०५-१२-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथे अनेक विकास प्रकल्पांसाठी खोदकामे सुरु असल्याने हे खोदकाम करतांना वीज कंपन्यासोबत समन्वय न साधल्याने त्याचा फटका महावितरण आणि एसएनडीएल या खाजगी वीज कंपन्यांना बसला असून दोन वर्षात शहरात २४८ ठिकाणी भूमिगत वीज वाहिन्या तुटल्यामुळे वीज पुरवठा खंडीत झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दोन वर्षापूर्वी मा.पालकमंत्री यांनी या संदर्भात बैठक घेऊन विविध विकास कामे करतांना संबंधित कंपन्यांशी समन्वय करण्याच्या सूचना देण्यात आल्या असताना विकास कामे करणाऱ्या ठेकेदारांनी या सूचनांचे पालन केलेले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या संदर्भात शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व चौकशी अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०२-२०१९)** : (१) हे खरे आहे. शहरात २६४ ठिकाणी भुमिगत वाहिन्या तुटून वीज पुरवठा खंडीत झाला.
(२) हे खरे आहे.
(३) नागपूर शहर मंडळांतर्गत, महावितरणच्या क्षेत्रात, एकूण ६९ ठिकाणी भुमिगत वीज वाहिन्या तुटल्यामुळे महावितरणचे एकूण रुपये ३०,०८,२५३/- इतक्या रकमेचे नुकसान झाले असून, त्यापैकी एकूण १५ ठिकाणी मेट्रोशी संबंधित ठेकेदारांनी तुटलेल्या वीज वाहिन्या जोडण्याचे काम केले आहे उर्वरित २७ ठिकाणी विकास कामे करणाऱ्या संस्थांनी महावितरणला नुकसान भरपाई अदा केली असल्याने तेथे महावितरणतर्फे कामे करण्यात आली असून संबंधित ठेकेदारांविरुध्द पोलीस ठाण्यात तक्रारी दाखल करण्यात आलेल्या आहेत. याशिवाय नागपूर शहर मंडळांतर्गत, वितरण फ्रेंचाइसी मे.एस.एन.डी.एल. क्षेत्रात एकूण १९५ ठिकाणी भुमिगत वीज वाहिन्या तुटल्यामुळे एकूण रुपये ७,६२,३७,१६०/- इतक्या रकमेचे नुकसान झाले असून, विकास कामे करणाऱ्या संस्थांनी १७७ ठिकाणी तुटलेल्या वीज वाहिन्या जोडण्याची कामे केली किंवा नुकसान भरपाई अदा करण्यात आली असल्याने, १८ ठिकाणी मे. एस.एन.डी.एल. तर्फे कामे करण्यात आली असून तेथे संबंधित ठेकेदारांविरुध्द पोलीस ठाण्यात तक्रारी दाखल करण्यात आलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील व्यायामशाळांना अनुदान मिळणेबाबत

**(४८) ४६२५७ (३०-११-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात व्यायामशाळा विकास योजनेंतर्गत व्यायामशाळा साहित्य अनुदानासाठी ५०० चौरस फुट बांधकामात कार्यालय, भांडारगृह, प्रसाधन गृह इत्यादी बाबींचा समावेश असणे बंधनकारक असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात याआधी आमदार/खासदार निधी अंतर्गत बांधकाम करण्यात आलेल्या व्यायामशाळा बांधकामात उपरोक्त बाबींचा समावेश नसल्यामुळे त्या व्यायामशाळा साहित्य अनुदानापासून वंचित राहत असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण, २०१२ नुसार व्यायामशाळा विकास अनुदान योजनेसंदर्भात शासन निर्णयातील ५०० चौरस फुट बांधकामाची अट शिथिल करण्यात आली आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०४-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील असंख्य आदिवासी विद्यार्थ्यांना वसतिगृहाच्या प्रवेशापासून वंचित ठेवल्याबाबत

**(४९) ४६४१० (०५-१२-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील एकूण २८ एकात्मिक आदिवासी प्रकल्पाच्या कार्यकक्षेतील शैक्षणिक सत्र सुरू होऊन साडेतीन महिन्यांच्या कालावधी लोटल्यानंतर उशीराने विद्यार्थ्यांना वसतिगृहांमध्ये प्रवेश देण्यात येऊन वसतिगृहाच्या प्रवेशापासून वंचित ठेवण्याची गंभीर समस्या निर्माण झाल्या असल्याच्या तक्रारीचे लेखी निवेदन 'समर्थन' संस्थेने दिनांक १६ ऑक्टोबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.मंत्री आदिवासी विकास, सचिव, आदिवासी विकास व अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांच्याकडे दिलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू निवेदनावर शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१८-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना https://swayam.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर प्राप्त झालेल्या व परिपूर्ण कागदपत्र असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना तात्काळ ऑनलाईन प्रणालीद्वारे प्रवेश देण्यात आलेला आहे. तसेच परिपूर्ण शैक्षणिक कागदपत्रे असलेल्या एकाही विद्यार्थ्यास प्रवेश नाकारण्यात आलेला नसून वसतिगृहाच्या प्रवेशापासून कोणताही विद्यार्थी वंचित राहिलेला नाही. त्यामुळे चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

विभागांतर्गत कार्यरत असलेल्या एकूण ४९१ वसतिगृहांमध्ये एकूण ५४०२१ विद्यार्थ्यांना वसतिगृहात प्रवेश देण्यात आलेला आहे.

वसतिगृहात प्रवेश न मिळालेल्या विद्यार्थ्यांना विभागीय, जिल्हास्तरावरील तसेच तालुकास्तरावरील विद्यार्थ्यांना पंडीत दिनदयाल उपाध्याय स्वयंम योजनेंतर्गत लाभ देण्यात येतो. त्या अंतर्गत विद्यार्थ्यांना भोजन, निवास व शैक्षणिक साहित्यासाठी त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये पैसे जमा करण्यात येतात.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विशेषत: वर्धा येथील व्यवसाय शिक्षण देणाऱ्या संस्थांनी केलेला गैरप्रकार

**(५०) ५०८२२ (१५-०७-२०१४). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात विशेषतः वर्धा येथील राज्यभरात व्यवसाय शिक्षण देणाऱ्या संस्थांनी बनावट विद्यार्थी दाखवून बनावट टी.सी. वर प्रवेश देवून शिक्षण शुल्क परीक्षा शुल्क तसेच मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या विद्यार्थी शुल्क वाटपातील गैरव्यवहार प्रकरणाबाबत दिनांक ९ ऑगस्ट, २०१२ रोजी नेमलेल्या समितीचा व क्रॉस इन्स्पेक्शनचा अहवाल एक महिन्यात शासनास सादर करणे अपेक्षित होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अहवाल शासनास कधी सादर करण्यात आला व इतर अहवालातील निष्कर्षाच्या आधारे शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१६-०२-२०१९) :** (१) व (२) होय.

सहायक आयुक्त, समाजकल्याण, वर्धा या कार्यालयातील शिष्यवृत्तीच्या वाटपामधील तथाकथीत गैरव्यवहाराची चौकशी करण्यासाठी शासन निर्णय, दिनांक ०९/०८/२०१२ अन्वये आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीचा अहवाल शासनास नुकताच प्राप्त झालेला आहे. सदर अहवालाची छाननी सुरु असून त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :** | **जितेंद्र भोळे**
**मुंबई.** | **सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.